**अपंग अधिनियम १९९५ मधील तरतुदीनुसार शासकीय/निमशासकीय सेवेतील पदे अपंगांसाठी सुनिश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांक: न्यायाप्र २००९/प्र.क्र. ५/सुधार-३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३ ऑगस्ट, २०१०

**वाचा :-** अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग ) अधिनियम १९९५

**प्रस्तावना :-** अपंग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग ) अधिनियम १९९५ च्या कायद्यान्वये अपंगांच्या सर्वांगीण विकासासाठी व त्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्यासाठी शासनाच्या विविध विभागामार्फत अपंगासाठीच्या विविध कल्याणकारी योजना राबविण्यात येतात. त्यामध्ये शासकीय व निमशासकीय सेवेत अपंग व्यक्तींसाठी ३% पदे आरक्षित करण्याची तरतुद आहे.त्याकरीता अपंग व्यक्तींसाठी पदनिश्चिती करण्यात येते.त्याप्रमाणे सर्व मंत्रालयीन विभागांनी त्यांचे नियंत्रणाखालील आस्थापनेवरील पदांची निश्चिती केलेली आहे व अपंग आरक्षणांतर्गत शासन सेवेतील अपंग व्यक्तींसाठी राखीव पदे त्वरित भरण्यासाठी शासन प्रयत्नशील आहे.

वरील प्रमाणे करण्यात आलेल्या पदनिश्चितीमध्ये एक वाक्यता नाही किंवा ती परिपुर्ण नाही.यासाठी अपंग व्यक्तीसाठी सुधारीत पद निश्चिती करणे व त्याअनुषंगाने अपंगांची राखीव पदे भरणे यासंदर्भात मुंबई उच्च न्यायालयात जनहित याचिका क्र.२२५/२००९ दाखल करण्यात आली आहे. सदर दाखल झालेल्या जनहित याचिकेच्या संदर्भात मा.उच्च न्यायालयाने शासकीय/निमशासकीय सेवेतील पदे केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अपंगासाठी सुनिश्चित करणेबाबतचे निर्देश दिले आहेत. अपंग व्यक्ती अधिनियमातील तरतुदीनुसार शासकीय/निमशासकीय सेवेतील पदे अपंगांसाठी सुनिश्चित करण्याबाबत तज्ञ समितीची स्थापना करण्यात आली आहे. मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार पद निश्चितीबाबत तज्ञ समितीने केलेल्या सूचना विचारात घेऊन शासकीय/निमशासकीय सेवेतील पदे अपंगांसाठी सुनिश्चित करण्याबाबत शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-** १) केंद्र शासनाने अपंग व्यक्ती अधिनियम १९९५ मधील तरतुदीस अनुसरून त्यांच्या अखत्यारीतील आस्थापनेवरील अपंग व्यक्तींसाठी पदे निश्चित केली असून त्याची यादी प्रसिध्द केलेली आहे. सदर यादी नुसार राज्य शासनाच्या अखत्यारीतील शासकीय व निमशासकीय आस्थपनेवरील जी पदे समान आहेत ती पदे संबंधित मंत्रालयीन विभागानी अपंगांसाठी निश्चित करावी व तसे आदेश निर्गमित करून त्याप्रमाणे अपंगांची पदे भरण्याबाबतची कार्यवाही करावी.

**(कृ.मा.प.)**

२) केंद्र शासनाच्या यादीतील पदांव्यतिरिक्त जी पदे राज्य शासनाच्या अखत्यारितील शासकीय व निमशासकीय आस्थापनेवर आहेत अशा पदांची अपंगांसाठी पद निश्चिती करणेबाबतचा प्रस्ताव संबंधित मंत्रालयीन विभागांनी तज्ञ समितीच्या मान्यतेसाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागा मार्फत सादर करावा.

३) ज्या पदांच्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये अंध व्यक्तींना पार पडणे शक्य आहे, अशा पदांसाठी आवश्यक असणारे सहायक तंत्रज्ञान संबंधित विभागांनी उपलब्ध करुन द्यावे. निवड झालेल्या अशा अंध कर्मचा-याना शासनाच्या सर्वसाधारण धोरणानुसार नियुक्तीचा परिविक्षा कालावधी लागू राहील.

२. सदरहू शासन निर्णय सर्व मंत्रालयीन विभागांनी आपल्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालयांच्या निदर्शनास आणावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक **२०१००८०३१६१९४१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**( सतीश गवई )**
**प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति :-
सर्व अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव / सचिव मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया बिल्डींग,हुतात्मा चौक,मुंबई (पत्राने )
सर्व विभागीय आयुक्त
आयुक्त,अपंगकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, वि.जा.भ.ज. व इ.मा.व. संचालनालय,पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व समाजकल्याण अधिकारी,जि.प.
विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती-सुधार-३